कोरपना, जिल्हा चंद्रपूर येथील दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग यांना कार्यालय प्रमुख व आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत . ..

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः डीडीओ २०१८/प्र.क्र.१८७/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ५ सप्टेंबर, २०१८

**वाचा -**

१ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः सीआरसी २०१८/प्र.क्र.५५/का.१२, दिनांक २३ मार्च, २०१८

२ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः सीआरसी २०१८/प्र.क्र.२३८/का.१२, दिनांक १० एप्रिल, २०१८

३ शासन पुरकपत्र विधि व न्याय विभाग क्रमांकः सीआरसी २०१७/प्र.क्र.२३८/का.१२, दिनांक २२ मे, २०१८

४ शासन निर्णय विधि व न्याय विभाग क्रमांकः सीआरसी २०१८/प्र.क्र.२३८/का.१२, दिनांक २५ जुलै, २०१८

५ शासन अधिसूचना विधि व न्याय क्रमांकः इएसटी २०१८/प्र.क्र.५६/का.१२, दिनांक २० जून, २०१८

६ सहायक प्रबंधक (निरीक्षणे), मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक ब (जन) -१००१/ २०१८/१०१५, दिनांक ०९.०८.२०१८

**प्रस्तावना -**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. १ येथील दिनांक २३ मार्च, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये अस्तित्वातील ग्रामन्यायालय कोरपना, जिल्हा चंद्रपूर याऐवजी दिवाणी न्यायालय कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग यांचे न्यायालय स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. अ.क्र. (२) येथे नमूद शासन निर्णयान्वये दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग कोरपना या न्यायालयासाठी पद निर्मिती करण्यात आली आहे. अ.क्र. (५) येथे नमूद दिनांक २० जून, २०१८ रोजीच्या अधिसूचनेन्वये दिनांक २३ जून २०१८ पासून दिवाणी न्यायालय कनिष्ठ स्तर तथा प्रथम वर्ग न्यायदंडाधिकारी कोरपना, जिल्हा चंद्रपूर हे न्यायालय कार्यान्वित झाले आहे. यास्तव, संदर्भाधीन दिनांक ०९.०८.२०१८ रोजीच्या पत्रान्वये सहायक प्रबंधक, निरीक्षणे, मा.उच्च न्यायालय मुंबई यांनी केलेल्या विनंतीस अनुलक्षून दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा प्रथम वर्ग

न्यायदंडाधिकारी कोरपना यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

कोरपना, जिल्हा चंद्रपूर येथे नव्याने स्थापन करण्यात आलेल्या दिवाणी न्यायालय कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग कोरपना या न्यायालयासाठी महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम क्रमांक १५(३) व १५६ अन्वये दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर तथा न्यायदंडाधिकारी प्रथम वर्ग कोरपना यांना "कार्यालय प्रमुख" तसेच, “आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तिय बाबींपुरतेच मर्यादीत राहतील.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग २, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तिय अधिकार नियमपुस्तिका १९७८ च्या भाग पहिला, उप विभाग एक, अनुक्रमांक तीन येथे नमूद नियम क्रमांक २ अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यास आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे..

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०५१५५०१४७३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagyashree Rajendra Bhaidkar

Digitally signed by Bhagyashree Rajendra Bhaidkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=Bhagyashree Rajendra Bhaidkar
Date: 2018.09.05 15:55:01 +05'30'

**(भाग्यश्री भाईडकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रबंधक (निरीक्षणे-१/२), उच्च न्यायालय अपील शाखा, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्यायालय चंद्रपूर,
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
४. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर कोरपना / राजुरा, जिल्हा चंद्रपूर,
५. जिल्हा कोषागार अधिकारी चंद्रपूर,
६. उप कोषागार अधिकारी, राजूरा / कोरपना, जिल्हा चंद्रपूर,
७. कक्ष अधिकारी का.७/२३/२४/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती (का.१२)